“श्रीक्षेत्र भिमाशंकर तीर्थक्षेत्र विकास आराखडा, तालुका खेड सह तालुका आंबेगाव, जिल्हा पुणे ” निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-आनिवि २०२१/प्र.क्र.६७ /का.१४४४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :१४ डिसेंबर, २०२१

**वाचा :** १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवि २०१८/प्र.क्र.०५/का.१४४४, दिनांक २८ फेब्रुवारी,२०१८

२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवि २०२०/प्र.क्र.५३/का.१४४४, दिनांक ५ फेब्रुवारी, २०२१.

३) जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे यांचे पत्र क्र.नि-१/ तीर्थक्षेत्र/भीमाशंकर/ निधी मागणी/ ३९३६ /२०२१, दि.१६ नोव्हेंबर २०२१ (पृ. ४३-५१ /प.वि.) व जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे यांचे पत्र क्र.नि-१/तीर्थक्षेत्र /भीमाशंकर/ निधी मागणी/ ४०६१ /२०२१, दि. २६ नोव्हेंबर २०२१.

**प्रस्तावना :-**

“श्रीक्षेत्र भिमाशंकर तिर्थक्षेत्र विकास आराखडा, तालुका खेड सह तालुका आंबेगाव, जिल्हा पुणे” विकास आराखडयास दि. २८ फेब्रुवारी, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.१४८.३७ कोटीच्या कामांना मंजुरी देण्यात आली आहे. या आराखडयाकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी जिल्हाधिकारी, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

“श्रीक्षेत्र भिमाशंकर तिर्थक्षेत्र विकास आराखडा, तालुका खेड सह तालुका आंबेगाव, जिल्हा पुणे” विकास आराखडयांतर्गत मंजूर कामे करण्यासाठी जिल्हाधिकारी, पुणे यांना सन २०२१-२२ मध्ये रु.१८.५० कोटी (रुपये अठरा कोटी पन्नास लक्ष फक्त) निधी वितरीत करण्यात येत आहे. या निधीचे उद्दिष्टनिहाय वाटप खालीलप्रमाणे आहे:-

**(रुपये कोटीत)**

| अ.क्र. | मुख्य लेखाशिर्ष | उद्दिष्ट | एकुण अर्थसंकल्पिय तरतूद (२०२१-२२) | वितरीत निधी |
|---|---|---|---|---|
| १ | ५४५२ (पर्यटनावरील भांडवली खर्च) ५४५२०१५१ | ५३-मोठी बांधकामे | ४०.०० | १८.५० |

२. “श्रीक्षेत्र भिमाशंकर तिर्थक्षेत्र विकास आराखडा, तालुका खेड सह तालुका आंबेगाव, जिल्हा पुणे” या विकास आराखडयाअंतर्गत मंजूर कामांवर होणारा खर्च लेखाशिर्ष “मागणी क्र.ओ-१०, मुख्य लेखाशीर्ष ५४५२-पर्यटनावरील भांडवली खर्च, ०१- पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ -पर्यटन केंद्र, (००) (०९) (५४५२ ०१५१) कार्यक्रम (दत्तमत) ” याखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. “श्रीक्षेत्र भिमाशंकर तिर्थक्षेत्र विकास आराखडा, तालुका खेड सह तालुका आंबेगाव, जिल्हा पुणे” या विकास आराखडयांतर्गत वर नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व प्रधान महालेखापाल, मुंबई यांचे कार्यालयाने नोंदविलेला खर्च याचा ताळमेळ घालण्यात यावा. तसेच वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, पुणे यांनी शासनास तात्काळ सादर करावे.

४. वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.अनौ.सं.क्र.४१६/२०२१/व्यय-८, दि.२१ ऑक्टोबर, २०२१ अन्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२१४१५१४१६८७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, pseudonym=F52EF95C5AE57B2B7645FA5EC3BC8FC14C4F892B, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2021.12.14 15:15:29 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी,

विभागीय आयुक्त, पुणेविभाग, पुणे.

जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे.

**प्रत,**

१) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मुंबई

२) मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मुंबई

३) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा,यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर

६) वित्त विभाग (व्यय-८), (अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई

७) जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे

८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

९) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई

१०) निवड नस्ती, नियोजन विभाग, का.१४४४, मंत्रालय, मुंबई